जय भवानी महिला सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, ता. पूर्णा, जि.परभणी या सूतगिरणीची शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सूतगि ३३१७/प्र.क्र.९०/टेक्स-१ (ब)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
तिसरा मजला, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :-**

१. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक सूतगि १११७/प्र.क्र.१९३/टेक्स १, दिनांक : २४ मार्च, १९९९.
२. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः सूतगि ११०८/प्र.क्र.९१/ टेक्स-१ (अ), दिनांक : ३० जून, २०११.
३. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः सूतगि ३३१६/प्र.क्र.८१/ टेक्स-१(अ), दिनांक : १० जुलै, २०१७
४. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः सूतगि ३३१५/प्र.क्र.७८/ टेक्स-१(अ), दिनांक २० जानेवारी , २०१८
५. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः धोरण- २०१७/प्र.क्र.६/टेक्स-५, दिनांक : १५ फेब्रुवारी, २०१८.

**प्रस्तावना :-**

राज्याचे नवीन वस्त्रोद्योग धोरण २०१८-२०२३ संदर्भाधीन क्र.५ येथील दि.१५.२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आले आहे. त्यानुसार सहकारी तत्वावर चालविण्यात येणाऱ्या सूतगिरण्यांकरीता भागभांडवलाची योजना ही फक्त कापूस उत्पादक जिल्ह्यांमध्ये राबविण्यात येणार असून ज्या तालुक्यामध्ये उत्पादित होणा-या कापसापैकी ५०% पेक्षा कमी कापूस सूतगिरण्यांसाठी वापरला जातो फक्त अशाच तालुक्यात सदर योजना राबविण्यात येणार आहे. तसेच राज्यातील सहकारी सूतगिरण्यांना १०:३०:६० या नवीन आकृतीबंधाप्रमाणे अर्थसहाय्य देण्यात येणार आहे. त्यानुसार जय भवानी महिला सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, ता. पूर्णा, जि. परभणी या सहकारी सूतगिरणीची शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत दि. ९.१०.२०१८ रोजी झालेल्या मा. मंत्रीमंडळ बैठकीत मान्य करण्यात आलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

नवीन वस्त्रोद्योग धोरण २०१८-२०२३ मधील अटी पूर्ण होत असल्याने जय भवानी महिला सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, ता. पूर्णा, जि. परभणी या सहकारी सूतगिरणीची १०:३०:६० या आकृतीबंधाप्रमाणे शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या दिनांक २४ मार्च, १९९९, दिनांक ३० जून, २०११, दि.१० जुलै, २०१७ , दि. २० जानेवारी, २०१८ व दि. १५ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयांमधील अटी व शर्ती तसेच भविष्यात वेळोवेळी शासनाकडून करण्यात येणाऱ्या सुधारणा व नव्याने अंतर्भूत होणाऱ्या

अटी व शर्ती या सूतगिरणीवर बंधनकारक राहतील. तसेच प्रत्येक टप्प्यावर सूतगिरणीने आवश्यक असणाऱ्या सर्व मंजुऱ्या / मान्यता घेणे बंधनकारक आहे.

२) सदर सहकारी सूतगिरणीचे भविष्यात आंतरराज्यीय रुपांतरण करावयाचे असल्यास शासनाची पूर्ण देणी एकरकमी दिल्यानंतरच तशी परवानगी देण्यात येईल.

३) सहकारी सूतगिरणीच्या कार्यक्षेत्रात वाढ करावयाची झाल्यास सूतगिरणीचे स्थलांतर होणार नाही.

४) सहकारी सूतगिरणीच्या सध्या अस्तित्वात असणाऱ्या कार्यक्षेत्रातील व नव्याने वाढणाऱ्या कार्यक्षेत्रातील सर्व सभासदांचे आधार कार्ड सूतगिरणीच्या सभासदत्वाशी जोडणे (लिंक करणे) बंधनकारक असेल.

५) शासन निर्णय, दि. २०.१.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार सदर सूतगिरणीने रु. १,२५,४०,०००/- इतके सभासद भागभांडवल जमा केले आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५३१/२०१८/व्यय-२, दिनांक १७.१०.२०१८ नुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०२१४४८१७८२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Prasenjeet Karlekar

Digitally signed by Prasenjeet Karlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co- Operation Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, cn=Prasenjeet Karlekar
Date: 2018.11.02 14:54:27 +05'30'

(प्रसेनजीत कारलेकर)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
२) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
३) मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, औरंगाबाद.
७) विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था, औरंगाबाद.
८) जिल्हाधिकारी, परभणी .
९) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, परभणी.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई - ४०० ००१.
११) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर.
१२) नियोजन विभाग (कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई.
१३) वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
१४) ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१५) अध्यक्ष, जय भवानी महिला सहकारी सूतगिरणी मर्या., एरंडेश्वर, ता. पूर्णा, जि. परभणी.
१६) निवडनस्ती टेक्स १ (अ) / (ब).